**मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षेत आमदार आदर्श ग्राम योजनेचा अंतर्भाव करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः आआग्रा-२०१५/प्र.क्र.७२/योजना-५**

२५, बांधकाम भवन, मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक : ११ ऑगस्ट,२०१५

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः व्हीपीएम-२०१४/प्र.क्र.१८३/पं.रा.३, दिनांक २४ फेब्रुवारी,२०१५.
२) शासन निर्णय क्रमांकः आग्रायो-२०१५/प्र.क्र.३६/योजना-५, दिनांक २० मे,२०१५.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाने आदर्श गांव साकारण्यासाठी दिनांक ११ ऑक्टोंबर,२०१४ रोजी सांसद आदर्श ग्राम योजना लागू केली आहे. केंद्र शासनाच्या सांसद आदर्श ग्राम योजनेच्या धर्तीवर राज्यातील विधानमंडळ सदस्यांनी देखील ग्राम पंचायतींना आदर्श ग्राम करण्यासाठी आमदार आदर्श ग्राम योजना राज्यात राबविण्याबाबतचा निर्णय दिनांक २० मे,२०१५ रोजी शासन निर्णयान्वये घेतला आहे. मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षेत आमदार आदर्श ग्राम योजनेचा अंतर्भाव करण्याचा निर्णय राज्य शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

केंद्र शासनाच्या सुचनेनुसार सांसद आदर्श ग्राम योजनेअंतर्गत मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील शक्ती प्रदत्त समिती संदर्भाधीन क्रमांक-१ अन्वये गठीत करण्यात आली आहे. राज्य शासनाने संदर्भ क्रमांक-२ अन्वये आमदार आदर्श ग्राम योजना राबविण्याचा निर्णय घेतला आहे.

केंद्र शासनाने सांसद आदर्श ग्राम योजना कार्यान्वित केली असून केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार या योजनेची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली सचिवांची शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षेमध्ये राजयात नव्याने सुरु करण्यात आलेल्या आमदार आदर्श ग्राम योजनेचाही अंमलबजावणीचा अंतर्भाव करणे आवश्यक आहे. मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दिनांक २२ मे,२०१५ रोजीच्या शक्ती प्रदत्त समितीमध्येही याबाबत चर्चा होऊन आमदार आदर्श ग्राम योजना शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षेत समावेश करण्याबाबत निर्देशित केले आहे. त्यामुळे या शक्ती प्रदत्त समितीच्या कार्यकक्षेमध्ये आमदार आदर्श ग्राम योजनेचा समावेश करण्याचा निर्णय या शासन निर्णयान्वये घेण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८११११५३१४५५६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V Giriraj

Digitally signed by V Giriraj
DN: c=IN, o=All India Service, ou=Principal Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=V Giriraj
Date: 2015.08.24 15:08:26 +05'30'

**वि.गिरीराज**

प्रधान सचिव, ग्राम विकास व पंचायत राज

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मलबार हिल, मुंबई.

२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.-३२.

३. मा.मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.

४. मा.राज्यमंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.

५. मा.विधानसभा सदस्य / मा.विधानपरिषद सदस्य (सर्व), महाराष्ट्र राज्य.

६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.

७. मा.अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव / सर्व मंत्रालयीन प्रशासकिय विभाग, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.

८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य-१ व २, मुंबई / नागपूर.

९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१ व २, मुंबई / नागपूर.

१०.विभागीय आयुक्त, (सर्व).

११.जिल्हाधिकारी (सर्व).

१२.मा.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व).

१३.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई (सर्व कार्यासने).

१४.निवडनस्ती (कार्यासन योजना-५).